महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळावर अध्यक्षाची नियुक्ती करणेबाबत ....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८१५/प्र.क्र.३६/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २८ मे, २०१५.

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, अधिसूचना क्रमांक : डब्ल्युएलपी-१००४/प्र.क्र.२२६/फ-१, दिनांक १०.१२.२००८.
२) महसूल व वन विभाग, अधिसूचना क्रमांक : डब्ल्युएलपी-२००९/प्र.क्र.१५/फ-१, दिनांक ०६.०३.२०१०.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक : डब्ल्युएलपी-२००९/प्र.क्र.१५/फ-१, दिनांक ०५.०७.२०११.

**प्रस्तावना :-**

जैवविविधता अधिनियम २००२ च्या कलम ६३(१) मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र राज्य जैविक विविधता नियम २००८ तयार करण्यात आले आहेत. सदर नियमातील तरतुदीनुसार राज्य जैवविविधता मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. जैविक विविधतेचे संवर्धन व ती निरंतर राहील अशा प्रकारे तिचा वापर आणि लाभांच्या समन्यायी वाटपासंबंधीच्या बाबी, या क्षेत्रातील तज्ञ व प्रदीर्घ अनुभवी आणि शासकीय अधिकारी नसलेल्या पात्र व्यक्तीची सदर मंडळाच्या अध्यक्षपदी निवड करणे आवश्यक आहे. सदर नियमातील नियम ३ (२) व ३(३) मधील तरतुदीनुसार मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय शोध समितीच्या शिफारसीनुसार मंडळाच्या अध्यक्षांची नियुक्ती राज्य शासनाव्दारे करावयाची आहे. त्यानुसार संदर्भीय शासन निर्णय ३ अन्वये डॉ. एरिक भरुचा यांची अध्यक्षपदी नियुक्ती करण्यात आली होती.

महाराष्ट्र राज्य जैव विविधता मंडळाचे अध्यक्ष डॉ. एरिक भरुचा यांचा ३ वर्षाचा कार्यकाल संपल्याने दिनांक ०६.१२.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये त्यांची नियुक्ती रद्द करण्यात आली होती. त्यानंतर अध्यक्ष पदासाठी नव्याने निवड करण्यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या त्रिसदस्यीय समितीने केलेल्या शिफरसीच्या अनुषंगाने शासनाने अध्यक्ष पदाच्या नियुक्तीस मान्यता प्रदान केली आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य जैविक विविधता नियम २००८ मधील नियम ३ मधील तरतूदीनुसार महाराष्ट्र राज्य जैव विविधता मंडळाच्या रिक्त असलेल्या अध्यक्ष पदावर डॉ. विलास सूर्यभान बर्डेकर यांची नियुक्ती करण्यात येत आहे. सदर पदाचे मुख्यालय नागपूर येथे राहील व नियुक्तीचा कालावधी शासन निर्णयाच्या तारखेपासून पुढील ३ वर्षाकरीता राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५२८११३०२१६११९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: CN = APTE ARVIND SHANKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010
Date: 2015.05.28 11:31:19 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य जैव विविधता मंडळ, नागपूर.
८. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.